वन विभागाची पुनर्रचना- प्रसिध्दी व माहिती विभागाची स्थापना या योजनेत्तर योजनेमधील अंधारखोली सहाय्यक (Dark Room Assistant) या अस्थायी पदास सन २०१९-२० मध्ये चालू ठेवण्यास मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एफडीएम -२०१९/प्र.क्र.२७/फ-२**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक:- १६ ऑक्टोबर, २०१९

**वाचावे :-**

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग,क्रमांक-एफडीएम-२०१९/प्र.क्र.२७/फ-२, दि. ३०.०३.२०१९.
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.पदनि २०१६/प्र.क्र.०८/आपुक. दि.११.०९.२०१९
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दि.१३.०९.२०१९
४) प्रधान मुख्य वनसंरक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-३/यो/प्र.क्र.१/१६-१७/१०५८/१७-१८, दि.३०.०९.२०१९

**शासन निर्णय :-**

वन विभागाची पुनर्रचना अंतर्गत "प्रसिध्दी व माहिती विभागाची" स्थापना या योजनेत्तर योजनेमधील 'अंधारखोली सहाय्यक' या अस्थायी पदास संदर्भीय क्र.१ वरील दि.३०.०३.२०१९ च्या शासन निर्णयान्वये दि.०१.०३.२०१९ ते दि.३०.०९.२०१९ पर्यंत चालु ठेवण्यास शासनाची मंजुरी देण्यात आली होती. सदर मुदत दि.३०.०९.२०१९ रोजी संपृष्टात आली आहे. खालील विवरणपत्रातील एका अस्थायी पदास वित्त विभागाच्या संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णय दि.११.०९.२०१९ च्या अधिन राहून दि.०१.१०.२०१९ ते २९.०२.२०२० पर्यंत चालू ठेवण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. तसेच सदर मुदत वाढ महसूल व वन विभागाने संदर्भ क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या आकृतीबंधात या पदांचा समावेश आहे या अटीच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | अंधार खोली सहाय्यक (Dark Room Assistant) | १ |
| | **एकूण** | **१** |

२. या पदांवर होणारा खर्च -प्रधान शीर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेतर) ०१ वनीकरण १०१ वनसंवर्धन विकास व पुनर्निर्मिती (०१) प्रशासन व संरक्षण (०१) (०१) प्रशासन व संरक्षण योजनेत्तर (२४०६ ००९६) ०१ वेतन या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२० मध्ये उपलब्ध होणा-या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. प्रस्तुत शासन निर्णय हा वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.०८/१६/ आ.पु.क., दि.११.०९.२०१९ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१०१६११३८४०१६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VIRENDRA
RAMBAHAL TIWARI

Digitally signed by VIRENDRA RAMBAHAL TIWARI
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=a95e1a9759002ee190cd79464daaba7dc840ec375cd62a646a64986631086810, postalCode=400032,
street=R AND F D,4TH FLOOR,MANTRALAYA,MUMBAI,
ou=FOREST DEPARTMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VIRENDRA RAMBAHAL TIWARI
Date: 2019.10.16 11:40:37 +05'30'

**( वीरेंद्र तिवारी )**
अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)
महसूल व वन विभाग

**प्रतिलिपी :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३) अप्पर प्रधान मुख्य वनसंरक्षक (सर्व)/मुख्य वनसंरक्षक (सर्व)
४) प्रसिध्दी व माहिती अधिकारी (वने), महाराष्ट्र राज्य, नागपूर
५) प्रसिध्दी व माहिती अधिकारी (वने), महाराष्ट्र राज्य, पुणे
६) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
७) वित्त विभाग, व्यय १०/अर्थसं-४/ वित्तिय सुधारणा, मंत्रालय, मुंबई.
८) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर
१०) कार्यासन अधिकारी, ब-१ महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) निवडनस्ती, महसूल व वन विभाग, फ-२ कार्यासन.